महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास सन २०१५-१६ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०१५ ते नोव्हेंबर, २०१५ या आठमाहीकरिता अनुदान (योजनेतर) वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-राअआ-२०१५/प्र.क्र.८६/का-९**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दि. २५ मे, २०१५.

**वाचा**:- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५.
२) शासन परिपत्रक, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.बीयुडी-२०१४/प्र.क्र.१४८ (भाग-२)/का-७, दि.२१ एप्रिल, २०१५.

**प्रस्तावना**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयास सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून माहे एप्रिल, २०१५ ते नोव्हेंबर, २०१५ या आठमाहीकरिता अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात रू. १,०७,९७,०००/- (अक्षरी रू. एक कोटी सात लक्ष सत्त्याण्णव हजार फक्त) इतके योजनेतर अनुदान मंजूर आहे. सदर मंजूर अनुदानाच्या ७० % अनुदान वितरीत करण्यासाठी उपरोक्त क्र. १ व २ येथील शासन परिपत्रकान्वये मान्यता देण्यात आलेल्या आहेत. त्यास अनुसरून महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी ७० % च्या मर्यादेत राहून माहे एप्रिल २०१५ ते नोव्हेंबर, २०१५ या आठमाहीकरिता रू. ७५,५७,९००/- (अक्षरी रू. पंच्याहत्तर लक्ष सत्तावन्न हजार नऊशे फक्त) इतके अनुदान खाली दर्शविलेल्या मासिकनिधी विवरणाप्रमाणे सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग यांनी खर्च विहीत मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी. सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) व ३६, सहायक अनुदाने (वेतने) या उद्दिष्टाखाली माहे एप्रिल, २०१५ ते नोव्हेंबर, २०१५ या आठ महिन्यांकरिता खालीलप्रमाणे योजनेतर अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

| मागणी क्र.झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९, (योजनेतर/दत्तमत्त) | | | | |
|---|---|---|---|---|
| अ. क्र. | तपशीलवार लेखाशीर्ष | सन २०१५-१६ साठी अर्थ संकल्पीय अंदाज पुस्तिकेत दर्शविण्यात आलेले अनुदान | ७० % प्रमाणे वितरणासाठी उपलब्ध अनुदान | माहे एप्रिल, २०१५ ते नोव्हेंबर, २०१५ करिता मंजूर अनुदान (प्रतिमाह) |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) | ४०,००,००० | २८,००,००० | ३,५०,००० |
| २ | ३६, सहायक अनुदाने (वेतने) | ६७,९७,००० | ४७,५७,९०० | ५,९४,७३७.५ |
| | **एकूण** | **१,०७,९७,०००** | **७५,५७,९००** | **९,४४,७३७.५** |

२.	सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०१५-१६ च्या मासिक निधी विवरण पत्रात दर्शविल्याप्रमाणे आपल्या कार्यालयाचा खर्च विहित मर्यादेपर्यंतच करावा. या आदेशान्वये वितरित करण्यात आलेल्या रकमेतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) तसेच संदर्भ क्र. १ शासन परिपत्रक, वित्त विभाग अन्वये विहीत अटी व तरतूदींचे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने करावे.

३.	उपरोक्त रक्कम “२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९, (योजनेत्तर/दत्तमत्त) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) व ३६, सहाय्यक अनुदाने (वेतन) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

४.	सदर शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२६११३४२७५६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ashok Hari Gaikwad

Digitally signed by Ashok Hari Gaikwad
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Hari Gaikwad
Date: 2015.05.26 11:44:13 +05'30'

**( अशोक गायकवाड )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
४) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अविवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
६) अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
८) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
९) पोलीस आयुक्त (सर्व)
१०) संचालक, लेखा व कोषागारे
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१३) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
१४) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१५) सर्व मंत्रालयीन विभाग
१६) उप सचिव, वित्त विभाग (व्यय-४), अर्थ-१४ नियोजन विभाग (का-१४७५) मंत्रालय, मुंबई,
१७) निवडनस्ती (कार्यासन-९)